शैक्षणिक वर्ष २०२१-२२ मध्ये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत शासकीय निवासी शाळा, अनुदानित आश्रमशाळा,केंद्रीय निवासी शाळा,शासकीय वसतिगृहे व अनुदानित वसतिगृहे सुरू करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक बीसीएच-२०२०/प्र.क्र.१०२/शिक्षण-२**

**मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,**

**मंत्रालय विस्तार,मुंबई ४०० ०३२**

**दिनांक: ७ ऑक्टोबर, २०२१**

वाचा:-१) समाज कल्याण आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र. सकआ/शिक्षण/शानिशा-आश्रमशाळा सुरू करणे/मार्गदर्शन/२०२१- २२, का.५/२०३२,दिनांक ६.८.२०२१

२) समाज कल्याण आयुक्तालयाचे पत्र क्र. सकआ/शिक्षण/शावगृ/सुरू करणेबाबत/२०२१-२२/का.५ अ -/२०८०, दि.१२.८.२०२१

३) समाज कल्याण आयुक्तालयाचे पत्र क्र. आपले पत्र क्र.सकआ/शिक्षण/शानिशा/५ वी ते ७ वी वर्ग सुरू/मार्ग/का.५/२१-२२/२४५२,दिनांक ९.९.२०२१

४) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२१ /प्र.क्र.११३/एसडी- ६, दिनांक १० ऑगस्ट,२०२१ व दिनांक २४ सप्टेंबर,२०२१

**प्रस्तावना-**

कोरोनाच्या प्रादुर्भाव रोखण्यासाठी राज्यात साथरोग प्रतिबंधात्मक कायदा,१९८७ मधील तरतुदीनुसार विभागांतर्गत असलेली शासकीय वसतिगृहे, अनुदानित वसतिगृहे, शासकीय निवासी शाळा, अनुदानित आश्रमशाळा, केंद्रीय निवासी शाळा बंद करण्यात आली होती. साथरोग प्रतिबंधात्मक कायदा,१९८७ अंतर्गत जिल्हाधिकारी तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने कोरोना बाधित रूग्णांच्या विलगीकरणासाठी विभागांतर्गत वसतिगृहे ताब्यात घेण्यात आली होती. तथापि,ब्रेक द चेन अंतर्गत टप्प्याटप्प्याने विविध आस्थापना सुरू करण्याबाबत निर्णय घेण्यात येत असून शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने दिनांक २४ सप्टेंबर,२०२१ च्या शासन परिपत्रकान्वये दिनांक ४ ऑक्टोबर, २०२१ पासून सुरू करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे. त्याच पार्श्वभूमीवर या विभागांतर्गत अनुसूचित जाती व नवबौध्द मुलामुलींसाठी सुरू करण्यात आलेल्या शासकीय निवासी शाळा,अनुदानित आश्रमशाळा,केंद्रीय निवासी शाळा,शासकीय वसतिगृहे, अनुदानित वसतिगृहे सुरू करण्याच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या दिनांक १० ऑगस्ट,२०२१ व दिनांक २४ सप्टेंबर, २०२१ नुसार देण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांसह सदर परिपत्रकात नमूद केलेल्या खालील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याच्या अटीच्या अधिन राहून सामाजिक न्याय विभागांतर्गत राज्यातील ग्रामीण भागातील शासकीय निवासी शाळा, अनुदानित आश्रमशाळा, केंद्रीय निवासी शाळांमधील इयत्ता ५ वी ते १२ वी व शहरी भागातील इयत्ता ८ वी ते १२ चे वर्ग तसेच,शासकीय वसतिगृहे व अनुदानित वसतिगृहे सुरू करण्याच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहे.

**मार्गदर्शक सूचना-**

१) स्थानिक प्रशासनाकडून पुनश्च: सामाजिक न्याय विभागाच्या ताब्यात मिळालेली वसतिगृहे व बंद असलेली वसतिगृहे सुरू होण्यापूर्वी वसतिगृहाचा संपूर्ण परिसर स्वच्छ करून तो निर्जंतूक करावा.

२) शाळेची/वसतिगृहाची इमारत, भोजनकक्ष, ग्रंथालय, संगणक कक्ष, स्नानगृहे व स्वच्छतागृहे यासह खोल्या, कॉट, गादी, उशी, चादर, बेडशीट, ब्लँकेट, पंखे, टेबल, खुर्ची, कपाटे इत्यादी सर्व निर्जंतूक करावा.

३) प्रवेशित विद्यार्थी जेव्हा वसतिगृहात प्रवेश करतील त्यावेळी त्यांना बाहेरील नळावर हातपाय स्वच्छ धुवून, तोडाला मास्क लावून व हात सॅनिटाईझ करूनच त्यांना वसतिगृहात प्रवेश देण्यात यावा.

४) शाळा/वसतिगृहामध्ये पाणी पिण्याची जागा, जेवणाची जागा, झोपण्याची जागा, बाथरूम, टॉयलेट दररोज निर्जंतूक करण्यात यावे.

५) शाळा/वसतिगृह सुरू करण्यापूर्वी वसतिगृहात थर्मल स्क्रीनिंगसाठी लागणारे साहित्य, पल्स ऑक्सीमिटर, थर्मामीटर, साबण, हॅन्डवॉश, साबण-सॅनिटायझर इत्यादी उपलब्ध होतील याची दक्षता घेण्यात यावी.

६) वसतिगृहात राहणाऱ्या गृहपालांचे निवासस्थान निर्जंतुक करण्यात यावे.

७) डोअर नॉब, कॅबीनेट हॅडल्स, कपाटे, लाईट स्वीच, फोन, संगणक, बेसीन, वैद्यकीय उपकरणे यासह फ्लोअरींग (फरशी) स्वच्छ आणि निर्जंतुक करण्यात यावे.

८) शाळा/वसतिगृह सुरू करण्यापूर्वी वसतिगृहाचे सर्व अधिकारी, कर्मचारी तसेच शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची कोविड-१९ ची आरटीपीसीआर चाचणी करणे आवश्यक राहिल. तसे प्रमाणपत्र सहायक आयुक्त, समाज कल्याण /मुख्याध्यापक यांना सादर करण्यात यावे.

९) शाळा/वसतिगृहातील ज्या कर्मचाऱ्यांचा आणि वसतिगृहातील प्रवेशित विद्यार्थ्यांचा चाचणी अहवाल पॉझिटिव्ह असेल त्यांना कोव्हिडमुक्त झाल्यानंतरच शाळा/वसतिगृहात उपस्थित राहण्याच्या सुचना देण्यात याव्यात.

१०) शाळा/वसतिगृहाचे सर्व कर्मचारी आणि वसतिगृहातील प्रवेशित विद्यार्थी यांचा अहवाल निगेटिव्ह असताना त्यांनी शाळेत/वसतिगृहात उपस्थित राहताना कोव्हिड-१९ संदर्भातील सर्व मार्गदर्शक सुचनांचे पालन करणे आवश्यक राहील. तसेच, कोविड-१९ बाबतचे कोणतेही लक्षणे आढळल्यास त्वरीत चाचणी करुन घेण्यात यावी.

११) शाळा/वसतिगृहात असताना प्रवेशित विद्यार्थी व कर्मचारी यांनी सामाजिक अंतराचे पालन करावे.

१२) शाळेच्या/वसतिगृहाच्या दर्शनी भागावर सामाजिक अंतर, मास्कचा वापर, इत्यादी संदर्भात मार्गदर्शक सूचना प्रदर्शित करावी.

१३) शाळा/वसतिगृह व परिसरात कर्मचारी आणि प्रवेशित विद्यार्थी यांना थुंकण्यावरील बंदीची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी. याबाबत सर्व संबंधितांना सक्त सूचना देण्यात याव्यात.

१४)शाळा/वसतिगृहातील प्रवेशित विद्यार्थ्यांनी वसतिगृहात ग्रंथालय, भोजनकक्ष, संगणक कक्ष, पिण्याचे पाणी, बेसिन, स्नानगृह, स्वच्छता गृह यांसारख्या सुविधांच्या वापराच्या वेळी एकापेक्षा जास्त प्रवेशित असल्यास रांगेत उभे राहण्याकरीता किमान सहा फुट इतके शारिरीक अंतर राखले जाईल. याकरीता विशिष्ट चिन्हे उदा. वर्तुळ, चौकोन इत्यादीचा वापर करण्यात यावा.

१५)शाळेत/वसतिगृहात वावरताना कर्मचारी आणि प्रवेशित विद्यार्थी यांनी शारिरीक अंतर राखण्यासाठी जेथे शक्य असेल तेथे येण्याजाण्याचे वेगवेगळे मार्ग निश्चित करणारे बाणांच्या खुणा दर्शविण्यात याव्यात.

१६)शाळा/वसतिगृहातील स्नेहसंमेलन, सहल, सभा, इतर सर्व कार्यक्रम ज्यामुळे अधिक गर्दी होण्याची शक्यता आहे, अशा कार्यक्रमांच्या आयोजनांवर कडक निर्बंध राहतील.

१७)शाळा/वसतिगृहातील प्रवेशित विद्यार्थी वसतिगृहात उपस्थित राहते वेळी त्यांच्या पालकांची लेखी संमती देणे आवश्यक असेल. आवश्यकता असल्यास याबाबत संबंधित वसतिगृहाच्या गृहपालांनी विद्यार्थ्यांच्या पालकांशी चर्चा करावी.

१८)शाळा/वसतिगृहातील विद्यार्थ्यांचा प्रवेश/उपस्थिती बंधनकारक नसून पालकांचे संमतीवर अवलंबून राहील.

१९)प्रवेशित विद्यार्थी आजारी असल्यास किंवा कोविडची लक्षणे आढळून आल्यास तात्काळ त्यांच्या पालकांना कल्पना देऊन सदर विद्यार्थ्यांना नजिकच्या कोविड सेंटरमध्ये दाखल करावे किंवा पालकांच्या संमतीने त्यांना त्यांच्या पालकांच्या ताब्यात देण्यात यावे,यासाठी पालकांचे संमतीपत्र घेण्यात यावे.

२०)शाळेचा/वसतिगृहाचा परिसर नियमितपणे स्वच्छ केला जाईल, याची दक्षता घेण्यात यावी.

२१) शाळा/वसतिगृहातील खोल्या, नेहमी स्पर्श होणारा पृष्ठभाग इत्यादींचे वारंवार स्वच्छता व निर्जंतुकीकरण करण्यात यावे.

२२)शाळा/वसतिगृहातील सर्व प्रकारच्या कचऱ्याची नियमितपणे विल्हेवाट लावण्यात यावी.

२३)हात धुण्याच्या सर्व ठिकाणी साबण, हँण्डवॉश व स्वच्छ पाण्याची व्यवस्था करण्यात यावी.

२४)शाळा/वसतिगृहात सुरक्षित व स्वच्छ पाणी प्रवेशित विद्यार्थ्यांना उपलब्ध होईल,याची दक्षता घ्यावी.

२५)शाळा/वसतिगृहात व परिसरात वावरताना सर्व कर्मचारी आणि प्रवेशित विद्यार्थी तसेच, अभ्यागतांना मास्कचा वापर करणे बंधनकारक करण्यात यावे.

२६)शाळा/वसतिगृहातील प्रवेशित विद्यार्थ्यांची दररोज थर्मल स्क्रीनींग चाचणी करण्यात यावी.

२७)शाळा/वसतिगृहाच्या परिसरामध्ये विद्यार्थी व कर्मचारी यांना कोणत्याही कारणासाठी एकत्र येण्याकरीता निर्बंध राहिल.

२८)शाळा/वसतिगृह कर्मचारी व प्रवेशित विद्यार्थी यांच्या व्यतिरिक्त बाहेरील व्यक्तींना शाळेच्या/वसतिगृहाच्या परिसरात प्रवेश निषिध्द करण्यात यावा.

२९)शाळा/वसतिगृहातील प्रवेशित विद्यार्थी सूचनांचे पालन करीत नसल्यास सदर बाब त्यांच्या पालकांच्या निदर्शनास आणून देण्यात यावी व याबाबत विद्यार्थ्यांना सक्त ताकीद देण्यात यावी.

३०)शाळा/वसतिगृहातील सर्व कर्मचारी व प्रवेशित विद्यार्थी कोरोना मुक्त कसे राहतील याबाबत गृहपालांनी आवश्यक ती खबरदारी घेण्याच्या सूचना देण्यात याव्यात.

३१)शाळा/वसतिगृहातील कर्मचारी अथवा विद्यार्थी आजारी असेल, सर्दी, ताप, खोकला असेल तर ताबडतोब याबाबतची माहिती गृहपालांना/मुख्याध्यापकांना देणे आवश्यक राहील.

३२)शाळेच्या/वसतिगृहाच्या परिसरात कोरोनाबाबत जनजागृती करणारे/माहिती असलेले पोस्टर दर्शनी भागावर लावावेत.

३३)शाळेच्या/वसतिगृहातील प्रवेशित विद्यार्थ्यांनी कपडे, टॉवेल्स,साबण,पेन, वही, भांडे दुसऱ्या विद्यार्थ्यांची वापरु नयेत. याबाबत विद्यार्थ्यांमध्ये जनजागृती निर्माण करावी. विद्यार्थ्यांना नियमितपणे हात धुण्यासाठी प्रेरित करावे.

३४)प्रवेशित विद्यार्थ्यांनी तोंड, नाक, डोळे किंवा शरीराच्या इतर भागास अनावश्यक स्पर्श टाळण्याच्या सूचना देण्यात याव्यात. जेणेकरुन विषाणूचा प्रार्दुभाव टाळता येईल.

३५)शाळा/वसतिगृहात अटल आरोग्य वाहिनी व डीजी हेल्थ प्रणाली कमांड सेंटरचे फोन नंबर दर्शनी भागावर लावण्यात यावेत. जेणेकरुन प्रवेशित विद्यार्थ्यांना काही अडचण असल्यास ते त्वरीत संपर्क साधने शक्य होईल.

३६)भोजन गृहातील कोणताही कर्मचारी आजारी असल्यास त्याला स्वयंपाक गृहात प्रवेश देऊ नये.

३७)शाळा/वसतिगृहामध्ये उदवाहन व व्हरांडयातील उपस्थित व्यक्तींच्या संख्येवर निर्बंध असावेत.

३८)प्रवेशित विद्यार्थ्यांची स्वच्छता गृहामध्ये अधिक गर्दी होऊ नये याची दक्षता घेण्यात यावी.

३९)चिंता व निराशा यासारख्या मानसिक आरोग्याच्या समस्या नोंदविणाऱ्या विद्यार्थ्यांचे समुपदेशन करावे.

४०)शाळा/वसतीगृहातील आजारी असलेल्या तसेच कोविडची लक्षणे असलेल्या प्रवेशित विद्यार्थ्यांना विलगीकरण कक्षात ठेवण्यात यावे.

४१)प्रवेशित विद्यार्थी समुहाने आजारी पडत आहेत असे निदर्शनास आल्यास वेळ न दवडता तात्काळ आजारी विद्यार्थ्यांची कोविड-१९ ची टेस्ट करण्यात यावी.

४२)प्रवेशित विद्यार्थ्यांपैकी एखाद्या विद्यार्थ्याचा कोविड-१९ चा अहवाल पॉझिटिव्ह आल्यास संबंधित विद्यार्थ्यास तात्काळ सार्वजनिक आरोग्य विभागाच्या विलगीकरण कक्षात दाखल करण्यात यावेत.

४३)कोविड-१९ ची टेस्ट करण्यापूर्वी तो विद्यार्थी शाळा/वसतिगृहातील किती विद्यार्थ्यांच्या संपर्कात आला आहे, हे तपासून त्या विद्यार्थ्यांची देखील नोंद घेऊन कोविड-१९ची टेस्ट करण्यात यावी.

४४)आजारी तथा कोविड सदृश लक्षणे असणाऱ्या विद्यार्थ्यांच्या बाबतीत उपचाराबाबत तथा आवश्यक कार्यवाहीबाबत गृहपालांनी पालकांच्या संपर्कात राहावे.

४५)शाळा/वसतीगृहाचे गृहपाल, शिक्षक तसेच, शिक्षकेतर कर्मचारी व प्रवेशित विद्यार्थी यांनी वेळोवेळी शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे तंतोतंत पालन करणे अनिवार्य राहील.

४६)शाळा/वसतिगृहातील गृहपाल व प्रवेशित विद्यार्थ्यांच्या संपर्कात येणाऱ्या कर्मचाऱ्यांचे तसेच, विभागांतर्गत शाळांमधील शिक्षक तसेच, शिक्षकेतर कर्मचारी व विद्यार्थ्यांच्या प्रत्यक्ष संपर्कात येणाऱ्या सर्व कर्मचाऱ्यांचे लसीकरण प्राधान्याने पूर्ण करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी यांच्या मदतीने नियोजन करण्यात यावे. तसेच, याबाबत सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, व मुख्याध्यापक तसेच जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांनी जिल्हाधिकाऱ्यांकडे पाठपुरावा करुन लसीकरण पूर्ण करण्याची दक्षता घ्यावी.

४७)उपरोक्त सूचनांव्यतिरिक्त शाळा/वसतिगृह विभागासाठी कोविड-१९ चा प्रार्दुभाव रोखण्यासाठी शालेय शिक्षण व क्रिडा विभागाने दिनांक १० ऑगस्ट, २०२१ व २४ सप्टेंबर, २०२१ अन्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना लागू राहतील.

४८)विद्यार्थ्यांना वसतिगृहामध्ये प्रवेश देताना शाळा/महाविद्यालये सुरू असल्याची खात्री करून तसेच शाळा महाविद्यालयांच्या मुख्याध्यापक/प्राचार्य यांचे हमीपत्र घेऊन प्रवेश दयावा.

वरील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच, शासनाने कोविड-१९ संदर्भात वेळोवेळी दिलेल्या सुचनांचे देखील पालन करण्यात यावे.

सदर कामावर होणारा खर्च हा निवासी शाळेसाठी लेखाशिर्ष ४२२५ ०५०५ व शासकीय वसतिगृहासाठी ४२२५ ०४८१ या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून प्रादेशिक उपायुक्त,समाज कल्याण यांच्या स्तरावर भागविण्यात यावा व त्याबाबतची देयके मान्यतेसाठी शासनास सादर करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२११००७१६१३३७६४२२ असा आहे. सदर परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, serialNumber=fd9b93035f4da174c04fa71634fe1f6aa493c78a5335f985651f937888df7a89, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2021.10.07 16:15:07 +05'30'

**( अ.कों.आहिरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,

२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.राज्यमंत्री,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) सर्व जिल्हाधिकारी,
६) सर्व अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
७) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८) सह आयुक्त (शिक्षण), समाजकल्याण, आयुक्तालय, पुणे,
९) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण,
१०) सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण,
११) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
१२) अ.मु.स., सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१३) निवडनस्ती (शिक्षण-२).